जल जीवन मिशन अंतर्गत प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन/भत्ते याकरीता राज्य पाणी व स्वच्छता मिशनला निधी वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ ९९७१ - राज्य हिस्सा)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जजीमी-२०२२/प्र.क्र.६६५/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,मंत्रालय
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: २१ मार्च,२०२३

वाचा-

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि -२०१९/ प्र.क्र.१३८/ पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. जजीमि -२०२०/ प्र.क्र.६५/ पापु ०७, दि.०४.११.२०२०
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांचे पत्र क्र.लेशा- ०८/PFMS/जेजेएम /२०२०/८०२, दि.०३.०६.२०२२
४. शासन निर्णय समक्रमांक दि.०९.०२.२०२३

प्रस्तावना-

संदर्भिय क्र.१ दि.०४.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या असुन जल जीवन मिशन अंतर्गत राज्य पाणी स्वच्छता मिशनसाठी ३९ पदे तर जिल्हा पाणी स्वच्छता मिशनकरिता १३६ पदांना मंजूरी देण्यात आली आहे. तसेच, संदर्भिय क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीच्या या पदांवरील वेतन व भत्त्यापोटी येणारा खर्च (२२१५ ९९७१) या लेखाशीर्षाखाली त्या त्या वित्तीय वर्षातील मंजुर तरतूदीतून भागविण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भिय क्र.१ च्या शासन निर्णयानुसार या प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन/भत्ते यांचे केंद्र व राज्य हिस्सा प्रमाण ०:१०० असे आहे. त्यामुळे या पदांच्या वेतन व भत्ते याकरीता लेखाशीर्ष २२१५ ९९७१ खाली राज्य हिश्श्याची स्वतंत्र तरतुद करणे अभिप्रेत होते. तथापि, जल जीवन मिशन सुरु झाल्यापासून मिशन अंतर्गत प्रतिनियुक्तीच्या पदांच्या वेतन व भत्त्याकरीता राज्य हिश्श्याखाली स्वतंत्र तरतूद करण्यात न आल्याने राज्य पाणी व स्वच्छता मिशनने या पदांच्या सन २०२०-२०२१ ते २०२२-२०२३ या कालावधीतील वेतन व भत्त्याकरीता रु.२३.३५३२३३९ कोटी निधी उपलब्ध करुन देण्याची संदर्भिय क्र.३ च्या पत्रान्वये विनंती केली होती.

त्यानुसार जल जीवन मिशन अंतर्गत प्रतिनियुक्तीवरील कर्मचा-यांच्या वेतन व भत्त्याकरीता लेखाशीर्ष २२१५ ९९७१ (सहाय्यिकृत बाबी घटक - राज्य हिस्सा) खाली ३६ (वेतन) हे उद्दिष्ट शीर्ष नव्याने समाविष्ट करुन रुपये २३.३५३३ कोटी रकमेचा पुरवणी मागणी प्रस्ताव डिसेंबर,२०२२ च्या अधिवेशनामध्ये सादर करण्यात आला होता. सदरचा प्रस्ताव मंजुर झाल्याने वित्त विभागाने उक्त लेखाशीर्षाखाली रु.२३.३५३३ कोटी इतका निधी अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) उपलब्ध करुन दिला होता. तथापि, तांत्रिक कारणास्तव सदरचा निधी लेखाशीर्ष २२१५ ९९७१ -३६ खाली अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवरुन (बीम्स) आहरित करता येत नसल्याने सदर निधी जल जीवन मिशन Single Nodal Agency खात्यात जमा करण्याकरीता एकवेळची विशेष बाब म्हणून लेखाशीर्ष २२१५ ९९७१ -३१ खाली पुनर्वितरणाने उपलब्ध करुन देण्याची वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. वित्त विभागाने सदर पुनर्वितरणास एक वेळची विशेष बाब म्हणून सहमती दर्शविली असल्याने संदर्भिय क्र.४ दि.०९.०२.२०२३ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन राज्य पाणी व स्वच्छता मिशनला लेखाशीर्ष २२१५ ९९७१ - ३१ खाली निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय-</u>**

जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२२- २०२३ या आर्थिक वर्षामध्ये पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण आणि सहाय्यिकृत बाबी घटकाखाली मागणी क्र. वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (२९) जल जीवन मिशनकरीता सहाय्यीकृत बाबी व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय (राज्य हिस्सा), ३१ सहाय्यक अनुदाने (२२१५ ९९७१) या लेखाशिर्षाखाली रु.२३,३५,३३,०००/- (अक्षरी-रु. तेवीस कोटी पस्तीस लक्ष तेहतीस हजार फक्त) इतका निधी जल जीवन मिशन अंतर्गत प्रतिनियुक्तीवरील कर्मचा-यांच्या वेतन व भत्त्याकरीता एकवेळची विशेष बाब म्हणून वित्त विभागाने पुनर्वितरणाने उपलब्ध करुन दिला आहे. सबब संदर्भिय क्र.४ दि.०९.०२.२०२३ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन हा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनने संदर्भिय क्र.३ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार खालीलप्रमाणे मिशन अंतर्गत प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचा-यांच्या सन २०२०-२०२१ ते २०२२-२०२३ या कालावधीतील वेतन व भत्त्यापोटी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| वेतन वेतन व भत्ते आणि मानधनावरील साधारण खर्च | | |
|---|---|---|
| | प्रतिनियुक्तीवरील अधिकारी/कर्मचारी | |
| | SWSM | DWSM |
| माहे सप्टेबर २०२० ते मे २०२२ मध्ये झालेला खर्च | ३,७९,९१,७४४ | ११,३५,९१,११० |
| सन २०२२-२३ मध्ये आवश्यक निधी | २,३४,२३,१२६ | ५,८५,२७,०२० |
| एकूण | ६,१४,१४,८७० | १७,२१,१८,१३० |
| | **२३,३५,३३,०००/-** | |

०२. हा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात यावा. हा निधी जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक M९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी.

०४. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि.०४.०४.२०२२ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.सं.क्र.४०/ व्यय-३, दि.३१.०१.२०२३ व अनौ.सं.क्र.१०१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२११८१७३५२५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD SWAMI

Digitally signed by PRASAD SWAMI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=aaf002dc55f52d8292cd1b600e0a80b7cf51b57c6f840c909c76407640c157f4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D84D41A9008354A0AF034B551119753B7D1C967B179AC7110EAA1867A160049, cn=PRASAD SWAMI
Date: 2023.03.21 19:12:29 +05'30'

**(प्रसाद स्वामी)**
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. उपसचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, वरीलप्रमाणे निधी तातडीने एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे येथील राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
७. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती- कार्यासन पापु १०